# गीतानुक्रम.

## अंगाई गीतें.



## आंदोलक गीतें.



## पुराणव्यक्तिगीतें.

## गीतानुक्रम.



### व्रतक्षेत्र गीतें.



### अध्यात्मिक गीतें.

## गीतानुक्रम.

### भक्तिपर गीतें.

# प्रास्ताविक शब्द.

अंतर्गृहांतील गीतांशीं पुरुषांचें वास्तविक कांहीं काम नसतां, ओटीवरून किंवा दिवाणखान्यांतून तीं त्यांचे कान आपणांकडे ओढून घेत असतात, हें कुणाला बरें माहीत नाहीं ? मोहक गळ्यांतून तीं बाहेर येत असतात म्हणूनच पुरुषांनां तीं मोहक वाटतात, असें असेल; किंवा तीं स्वतःच तशीं मोहक असतात म्हणूनच त्यांनां आवडतात, असेंहि कदाचित् म्हणतां येईल. आम्हां स्त्रियांनां मात्र तीं पुरुषांचें मन आपणांकडे ओढतात म्हणून आवडतात हें तर खरेंच; पण आणखी आपल्या अंगच्या मोहकपणामुळें तर तीं आम्हांला अगदीं वेड लावितात, इतकी मोहिनी त्यांच्यांत भरलेली आहे.

हीं गीतें कोणत्या काळाची निष्पत्ति असेल हें कोणीं सांगावें ? मयूर कवींच्या लेकींनीं अथवा श्रीमंत नानासाहेब पेशव्यांच्या सुनांनींहि तीं गाइलेलीं असतील; वामन पंडितांच्या पत्नीनें अथवा मुक्तेश्वरांच्या बहिणीनेंहि तीं गाइलीं असतील; किंवा कदाचित् त्या पूर्वींच्या काळीं ज्ञानेश्वर, मुकुंदराय यांच्या आयांनींहि तीं गाइलेलीं असतील, इतकीं तीं जुनीं असण्याचा संभव आहे.

या गीतांचा एक समुद्रच बनेल, एवढी त्यांची संख्या मोठी आहे. त्या समुद्रांतील कांहीं रत्नें यापूर्वींच तीनचार पुस्तकांच्या रूपानें प्रकाशित झालेलीं आहेत; पण अजून प्रसिद्ध झालीं नाहींत अशा गीतांचीच संख्या फार मोठी आहे. अशीं कांहीं गीतें लहानपणीं मला माझ्या लाडक्या आईनें शिकविलीं होतीं.

त्यानंतर माझ्या परमपूज्य सासूबाईंनींहि सांगितलीं होतीं. त्यांतूनच निवड करून हीं गीतें मी या पुस्तकांत ग्रथित करीत आहें. यांतील ३९ गीतें अगदीं प्रथमच छापलीं जात आहेत; बाकीचीं ह्मणजे फक्त पांचच पूर्वीं प्रकाशित झालेलीं आहेत हीं पांच तरी पुन: कशाला छापलीं ? असें माझ्या कित्येक वाचकभगिनी ह्मणतील. पण याचें कारण पाठभेद हें होय. हीं गीतें माझ्या ज्या भगिनी वांचतील, त्यांनां त्यांच्या पहिल्या आणि आतांच्या रूपांतील अंतर सहज कळून येईल.

या ' अंतर्गृहांतील गीतां 'पैकीं **'अंगाई गीतें'** इतकीं सहज-मनोहर आहेत, कीं, निद्रेप्रमाणेंच तीं अगदीं स्वाभाविक वाटतात; कृत्रिमपणाचा त्यांनां कसा तो गंधंहि नाहीं ! 'आंदोलक गीतें' हीं इतकीं सरळ व निष्कपटभावानें भरलेलीं आहेत, कीं, हिंदोळ्याच्या हेलकाव्याप्रमाणेंच तीं आपल्या कंठाला व हृदयाला हेलकावे दिल्यावांचून रहात नाहींत ! इतर गीतांपैकीं रुक्मिणी, भामा आणि पार्वतिसंबंधाच्या गीतांतील विनोद; कौसल्या, सीता, द्रौपदि यांच्याबद्दलच्या गीतांतील करुण रस; ' विष्णुपत्नि, ' ' नीलकंठ ' या गीतांतील भक्तिभाव, आणि ' माहेर, ' 'सासर ' वगैरे गीतांतील अध्यात्म ज्ञान हीं **' नयनीं ये जळ जेवीं सहजीं सखये'** याप्रमाणेंच इतकीं स्वाभाविकपणें हृदयांतून बाहेर आलेलीं आहेत, कीं, तीं ज्याला आपल्या मोहिनीसामर्थ्यानें भारून टाकणार नाहींत, असें हृदय महाराष्ट्रांत तरी सांपडणें कठीण, असें मला वाटतें !

## प्रास्ताविक शब्द.

या गीतांच्या चालीहि जितक्या हृदयंगम तितक्याच सुलभ असल्यामुळे, त्या वाचतांवाचतांच लागतात. शिवाय त्यांचीं चरणें पदें तोडून छापिलीं असल्यामुळें तर त्यांजवर 'अमूक चालीवर' हें लिहिण्याचें प्रयोजनच उरलें नाहीं.

गीतांच्या कर्त्रींचीं व कर्त्यांचीं नांवें कालाच्या उदरांत बुडून गेलेलीं आहेत. त्यांचीं हीं गीतें तरी उपलब्ध झालीं, हें भाग्यच होय! गीतें प्रसविणारी प्रतिभा जरी मला स्वतःला नाहीं, तरी दुसऱ्यांच्या गीतांचें सुईणपण करण्याचें श्रेय मला लाभलें, असें मी समजतें! नवें देऊळ बांधण्याची मोठी पुण्याई जीर्णोद्धारानें ह्मणजे जुन्या देवळाची डागडुजी करून त्याचा उद्धार केल्यानेंहि लाभते ह्मणतात. त्याप्रमाणें नवीन गीतें गाईन इतकी पुण्याई माझी नसतांहि, काला इतक्या जुन्या अशा या "अंतर्गृहांतील गीतां"च्या प्रकाशनानें तें पुण्य मला लाभल्यासारखें वाटलें, तर त्यांत नवल काय?

हीं गीतें पुढें आणण्याच्या कामीं माझ्या प्रिय पतीकडून मला इतकें उत्तेजन मिळालें आहे, कीं, त्या उत्तेजनाच्या अभावीं हीं पुढें येणें शक्यच नव्हतें! शेवटीं, पुढील गीतें एकवार तरी चाळून पहाण्याविषयीं माझ्या वाचकभगिनींना विनंति करून त्यांचा मी निरोप घेतें.

इंदूर,<br>माघ शुद्ध एकादशी,<br>शके १८३६.

**संपादिका.**

# अंतर्गृहांतील गीतें.

## अंगाई गीतें.

### दृष्ट.

तान्हिया तान्हिका !
माझ्या बाळा रे माणिका !

आतां दृष्ट झाली
तान्ह्या बाळाच्या श्रीमुखा.
दांत डाळिंबाचे दाणे !
ओठ पोंवळ्याच्या वेली !
तान्हें ग माझें बाळ
त्याला गी दृष्ट झाली !

तान्हियाला दृष्ट झाली,
मिठाचें ग झालें पाणी !
तान्हें ग माझें बाळ
कोमेजलें फुलावाणी !

तान्हियाला दृष्ट झाली
मिठाच्या ग झाल्या लाह्या !

तान्हिया ग बाळाच्या
कोमेजल्या दंडबाह्या !

माळयाच्या मळयामध्यें
[१]यशोबंध रोपाटोपा,
तान्हें ग माझें बाळ
दृष्ट झाली त्याच्या रूपा !

माळयाच्या मळयामध्यें
यशोबंध ग कोंवळा,
तान्हिया बाळाच्या
दृष्ट झाली जायवळा !

माळयाच्या मळयामध्यें
यशोबंध ग तो नाहीं,
तान्हिया बाळाला
दृष्ट झाली करूं काई !

१ मेंदी. मेंदीचा पाला व मीठ घेऊन दृष्ट काढितात.

## फुलमाला.

फुलांमध्यें फुल
नाजुक गुलाबाचें,
काय दिसतें बाई
मोतीया रंगाचें !

फुलांमध्यें फुल
बारीक बकुळीचें,
मधुर त्याचा श्वास
काय दिसतें मौजेचें.

फुलांमध्यें फुल
नाजुक शेवंतीचें,
पिंवळ्या रंगाचें
पन्नास पाकळ्यांचें

माळ्याच्या मळ्यामध्यें
नाजुक गे दवणा,
चांफा मस्तवाल !
धुंदकार कोना कोना !

फुलांमध्यें फुल
नाजुक मोगरीचें,
केवडा मस्तवाल,
धुंदकार चहूंकडे !

## भूक.

गाई हंबरती
वांसरें कोठें गेलीं ?
तान्हिया बाळाची
भुकेची वेळ झाली !

वाटीभर गे दूध
वर साखर माईना,
तान्हियें माझें बाळ
छंदखोर गे राहीना !

वाटीभर गे दूध,
वर साखरेची मूठ,
तान्हिया माझ्या बाळा
छंदखोरा आतां ऊठ !

## रूपलेणीं.

बाळ दिसे गोजिरवाणें
या अशा रूपलावण्यें !
हौशी गे पितया, त्यानीं
केलीं हीं बाळलेणीं.

कडि बिंदुली गे बाई
जाडताची पिंपळपानी;
पायांत घागऱ्या, वरती
सांखळ्या आणि पैंजणी.

दंडीच्या वाकि गे बाई
झुंबराचे घोंस लावूनी;
भिंगाचा चांदला वरती
लोंबती तीं खेळणीं.

बाळाचें रूपलावण्य
प्रकाश पाडी महालाभर;
बाळाचें नहाण होतां
दिन लागे तिसरा प्रहर.

नवस गे बाई मीं केला
देवाला गरुडावळीं;
काशीच्या कावडीं तुजला
घालीन मी आंघोळी.

## ताई.

कटिं सूत्र पिंपळपान,
बाळाच्या कटिं सूत्र पिंपळपान;
रुणझुण रुणझुण रुणझुण
रुणझुण वाजवीत पैंजण
येई ताई रुणझुण
रुणझुण, बोले बाळा खिदळून:—
"घेत्यें मी उचलून,
कडे ग घेत्यें मी उचलून !
नेत्यें मी आंगणीं
गे बाळा नेत्यें मी आंगणीं."
"लडलड काय बोलशी
लडलड, घे ना वर उचलून !"
रुणझुण रुणझुण रुणझुण
रुणझुण वाजवीत पैंजण
नेई ताई रुणझुण
रुणझुण, खेळवि त्या लागून !

## नको येऊं.

घागऱ्या वाजति घुळुघुळु,
नको येऊं माझ्या मागें !
तान्हिया माझ्या बाळा
सर्वांची दृष्ट लागे !

घडिघडिं लिंबलोण
बाळा उतरीतें कोण ?
तान्हिया माझ्या बाळा
अगा तुझी मावळण[1] ?

घडिघडिं लिंबलोण
बाळा उतरी सायासीं
तान्हिया माझ्या बाळा
अगा तुझी रे मावशी ?

घागऱ्या वाजति घुळुघुळु,
दणाणीत माझा झोंपो[2];
तान्हिया माझ्या बाळा
खेळ येथ प्राणसखा !

---

१ आत्या. २ झोपा, घर.

## जीवंतिका.

माऊली जीवंतिके !
माझी गे तुला भाक !
माझ्या या तान्हियाला
फुला गे वाणी राख !

माऊली जीवंतिके !
रानांत तुझी माडी,
माझ्या गे तान्हियाला
तेथूनि दया धाडीं !

माऊली जीवंतिके !
माझी गे तुला भाक !
माझ्या या तान्हियाला
फुला गे वाणी राख !

## पाळणा.

बाळा जो जो रे राजसा !
सुकुमार डोळसा !
पाळणा पिंजारी चौफेरी,
रत्नखचित त्या दोरी;
खचिलीं तोरणें मनोहरा,
तुजलागीं सुंदरा !
अंबर वाघनखें ताईता,
सागरगोटा, पट्टा
जडित जडावाचा पेट्यांचा
सुंदर मोतीयांचा !
सांखळी, सरी, बिंदूली,
माणीकें जोडिलीं;
पिंपळपानासीं शोभलीं
अति बहूत चांगलीं !
बाळा जो जो रे राजसा
सुकुमार डोळसा !

# बाललीला.

खरि झाली दृष्ट माझ्या बाळाला वाटतें !
डचडचके लेंकरूं गे ! तिनतिनदां उठतें !
रडत भारी, उगिल कैसें ऐसें मज होत तें !
धीर घेई जिवाला मी तरि शांती येइना !
रडतांना हृषिकेशी गे माझें राहिना !
ना राही पाळणीं तें, घे उचलून खालतें !
नको नेऊं बाहेरी त्या दुधभात भरवितें !
कानटोपी, हातिं सार्जे, अंगारा करितें !
हंसुं येई सांवळ्याचें बोबडा बोलतां !
जाई गाय वांसरासीं धरि पुच्छ पालथा !
धीट मोठा बागुलासी तिळमात्र भिईना !
जाऊं दे तुलसिपाशीं, तान्हें गे फिरेना !
नवसाचें बाळ माझें अझुनी कां येइना ?
उखळीसी बांधोनीयां टाकीला आंगणा,
तरि अझुनी बरी बुद्धि देव या देइना !
धन्य गे यशोदे हें ये उदरीं बालक !
भक्तांचे साह्यकारी ! वैकुंठ पालक !
देवादी गुण गाती, तरि शांति होइना !
धीर घेती जिवाला गे तरि शांति येइना !

---

१ लेणीं.

# शाळेचे चाळे.

नंदानें दिन पाहिला,
श्रीहरिला बोलाविला,
आणविली रंगित पाटी,
दे वस्त्रें पंतोजिला,
घालि शाळेला !

"उठा उठा उजाडे दारीं,
डोळ्यावरि ये अंधेरी;
तोंड धुवा जाउनि बाहेरी,
अशाला कुणि देइ नवरी !
हंसतिल पोरी !

अंगा डोकीं घालुंद्या तुह्मां
सुकुमार दोघां घननीळा !
पायीं घाला जोडे, रुपतील
खडे चरणाला !"

"आई जलदि उठवि गे मला !
लौकरीं होऊं दे पहिला !
पंतोजी अगदीं मूर्ख !
दादा तर निव्वळ शंख !
अक्षरें काढि फेंगडीं
ह्मणे मी शहाणा !"

## अंतर्गृहांतील गीतें.

एक दिनीं नंद " वेल्हाळ !
थंडिचे नका उठुं बाळ ! "
सकाळिं खेळे भिंगऱ्या,
चेंडुच्या मोजि घागऱ्या,
मारितो गोट्या लगोऱ्या,
उडवितो उंच वावड्या,
वाजवी चंग, नंदा दावि ढोंग,
आणितो सोंग !

" पंतोजि घालितो धडा,
मज ये ना पहिला पाडा,
पोरां मारी फडफडा,
दादाला बसती छड्या !
आई खचीत पुसतों तुला
कैं आणशिल मला ?

आई नवसीलें गणपतिला,
लिहिणें येऊं दे रे मला !
उद्यां लिहीन मनापासून !
गणपति झाले प्रसन्न !
लाडू कर हराभरून !
थोडे दे त्याला, उरले दे मला !
सांगतों तुला !

## अंगाईगीतें.

आई घुसळण पाहुं दे मला
दे ताक माझ्या दादाला
मधुर पीण्याला !

दादा किति प्याला ताक !
त्यानें मज आला ताप !
वर पंतोजीचा धाक !
दादा करील माझी टाप,
धाडुं नको त्याला !"

एक दिनीं नंद शाळेला !
पुसुं लागे पंतोजीला
"किति मुलगा तरबेज झाला ?"

पंतोजी ह्मणे "कपाळा !
ओनामा येना त्याला !
थोरांचीं पोरें उर्मट !
त्यामधीं कृष्ण चावट,
करी तो चाळे !"

मग नंद रागाविला,
श्रीहरिला बोलाविला,
आले वाड्याला !

## ताईबाई.

माझ्या गे अंगणांत
कोणाची गोरी बाळ ?
गळ्यांत मोहनमाळ—ताईबाई!

माझ्या गे दारापुढें
केवढी झाली दाटी !
तींतली चिंचपेटी—ताईबाई !

माझ्या गे दारावरुनी
पैठणीची गेली कोणी !
हातिं आंगठी हिरकणी—ताईबाई !

सरज्याची नथ नाकीं,
पडे खालती साऊली,
चित्रशाळेची बाहूली—ताईबाई !

छाटिणीची हिरवी चोळी
दंडी गे उसविली,
नागीण दृष्टाळली—ताईबाई !

चितारी काढी चित्र,
चित्र काढीतो रेखूनी,
रूप तुझेंचि देखूनी—ताईबाई !

## भाऊराय.

माझ्या गे दारावरुनी
कोणाचा घोडा जाई ?
बीजेला ताई नेई—भाऊराय !

माझ्या गे दारावरुनी,
कोण गेला झपाट्याचा ?
कुसुंबी पागोट्याचा—भाऊराय !

माझ्या गे दारावरुनी,
कोण गेला चंगीभंगी ?
हातिं रुमाल पंचरंगी—भाऊराय !

परवी नारी डाव्या
पायाचा करी फेर !
आपली जाया जाई फुलें मनोहर !

माझ्या गे घरावरुनी
जाई हत्ती नवलाई !
अंबारीं वहिनीबाई—भाऊराय !

## वहिनीबाई.

काळी गे चंद्रकळा
जणुं काजळाचें अंग !
घेतली कोणीं सांग—वहिनीबाई !

काळी गे चंद्रकळा
तीवरी रामसीता !
नेसली पतिव्रता—वहिनीबाई !

माडी गे वरी माडी
माडीला जाळ्या जाळ्या !
चंद्रकोरी तुझ्या बाळ्या—वहिनीबाई !

साऊळ्या मेहुण्यानें
समुद्र चाळियला
मोत्यें तुझ्या गे बाळ्यांना—वहिनीबाई !

साऊळ्या मेहुण्यानें
समुद्र पांखडीला
मोत्यें तुझ्या राखडीला—वहिनीबाई !

सवाशें दीडशांची
हिरवी पैठणी
नेसली भाऊराणी—वहिनीबाई !

सुनेला सासुरवास
नको करूं वहिनीबाई !
आपला आहे चांफा, परक्याची आली जाई

## रामकुंड.

राम गे कुंडावरी
हिरवा मंडप जाईचा !
आंघोळीला आला पुत्र कौसल्यामाईचा !

राम गे कुंडावरी
हिरवी पालखी कोणाची ?
आंघोळीला आली सीता जानकी रामाची!

राम गे कुंडावरी
रामराय स्नान करी !
धोतराचा पिळा सीताबाई-खांद्यावरी !

राम गे कुंडावरी
सवाष्णींची झाली दाटी !
रामाची सीताबाई तबकीं विडे वांटी !

राम गे कुंडावरी
रामराय संध्या करी,
सोन्याचें जानवें त्याच्या डाव्या भुजेवरी !

राम गे कुंडावरी
दोन सोन्याचे रांजण !
रामाची सीताबाई वर फिरते नागीण !

राम गे कुंडावरी
पिंवळी नागीण पसरली !
रामाची सीताबाई चंद्रहार विसरली !

## आंदोलक गीतें.

रामाला आला घाम
सीता पुशी पदरानें !
कोणाची झाली दृष्ट–रथ गेला सडकेनें !

शिंदे गे शाई तोंडे
सीतेच्या हातामध्यें !
उजेड काय पडे श्रीरामाच्या रथामध्यें !

शिंदे गे शाई तोंडे
सीताबाई कोठें केले ?
तेवढ्यासाठीं राम गडे इंदूराला गेले !

## काळा.

कोणी एके दिनीं विनोदें
हरीस बोले रुक्मिणी,
"कृपा करूनी आधीं सांगा,
देईन विडा मगशानी !
तुह्मि थोरांचे अहां, परंतू
काळे कां हो ? मी गोरी !"

हरी ह्मणे "मी सुत गवळयाचा,
मजवरि धुरळा भुवनाचा !
शिशूपाळ हा वर योजियला,
नाहीं काजाकामाचा !"

शाम सांवळा बोले मंजुळा
तुळसी झाल्या जड गळा !
"मम प्रिये मीं पूर्विं जाणिलें
भ्रतार नाहीं तुझ्या मना !"

क्रोध न आंवरे, भीमकबाळी
धरणीवरती मग पडली !
दीन दयाळा येत कळवळा,
कुरवाळी मुख सांऊळा !

कृष्ण बोलिला "नंदराणिनें
काजळ लावियलें गालां,
नाहीं धुविलें, तसें राहिलें
गुंतुनि भक्ताकामाला !"

# पीतांबर.

एके दिवशीं हरि असतां निजभवनीं,
प्राणवल्लभा जवळी नाहीं कोणी !
दूति पाठवुनि भामेसी आणविलें,
सुखसंवादीं प्रहर चारही गेले !

जातां पीतांबर भामेनें नेला !
हरिनेंही पीतांबर नेऊं दिधला !
सहस्र सोळा नारींनीं देखियला,
जाउनि सांगितलें मंदिरिं रुक्मिणिला !

इतकें ऐकुनि, वेगें भीमककुमरी
कोपें झळकत ये श्रीहरिमंदीरीं !
"उघडे कांहा ऐसे निजलांत हरि ?
नाहीं पीतांबर कां सुखशेजवरी ?"

"मत्स्यअवतारीं गे मीं तो धरिला,
शंखासुर सायासीं जेव्हां वधिला !
दैत्या वधितां जीव बहू कष्टियला,
तेव्हां पीतांबर तो जळिं राहियला !"

"मत्स्य अवतारीं होत्यें मत्स्या मीं,
शंखासुर सायासी वधितां तुह्मीं !
जीव जरी हरि तुमचा बहु कष्टियला,
नाहीं पीतांबर तो जळिं राहियला !"

---

१ अंगावर घेण्याचें पिवळें वस्त्र, शेला किंवा शाल. २ धारण केला.

"कच्छ अवतारीं गे मीं तो धरिला,
भार सृष्टीचा पृष्टीं सांवरिला!
सांवरितांना जीव बहू कष्टियला,
तेव्हां पीतांबर तो जळिं राहियला!"
"कच्छ अवतारीं होत्यें कच्छा मी,
भार सृष्टीचा सांवरितां तुह्मीं !
जीव जरी हरि तुमचा बहु कष्टियला,
नाहीं पीतांबर तो जळिं राहियला!"
"वराह अवतारीं गे मीं तो धारिला,
भार सृष्टीचा दाढें सांवरिला!
सांवरितांना जीव बहू कष्टियला,
तेव्हां पीतांबर धरणीं राहियला!"
"वराह अवतारीं हो वराहि ना मी ?
भार सृष्टीचा सांवरितां तुह्मीं !
जीव जरी हरि तुमची बहु कष्टियला,
नाहीं पितांबर धरणीं राहियला!"
"नारसिंह अवतारीं मीं तो धारिला,
प्रल्हादाला जेव्हां मीं रक्षियला !
रक्षियतांना जीव बहू कष्टियला,
तेव्हां पीतांबर स्तंभीं राहियला!"
"नारसिंह अवतारीं हो स्तंभीं मी !
हिरण्यकश्यपु जेव्हां वधिला तुह्मीं !

जीव जरी हरि तुमचा बहु कष्टियला,
नाहीं पीतांबर स्तंभीं राहियला ! ”
“ वामन अवतारीं गे मीं तो धरिला,
दान मागण्या गेलों बळिदाराला !
बळी रगडुनी पाताळीं घातियला,
तेव्हां पीतांबर पाताळीं उरला !”
“ वामन अवतारीं कमंडलु मी !
दान मागण्या गेलां जेव्हां तुह्मी !
बळी रगडितां जीव जरि कष्टियला,
नाहीं पीतांबर पाताळीं उरला ! ”
“ परशुराम अवतारीं मीं त्या धरिलें,
एकवीसदां निःक्षत्रिय जग केलें !
जीव सये ! माझा जेव्हां कष्टियला,
पीतांबर तेव्हां कोठें राहियला !”
“ परशुराम अवतारीं मी हो लक्ष्मी !
निःक्षत्रिय जग जेव्हां केलें तुह्मी !
जीव जरी हरि तुमचा बहु कष्टियला,
नाहीं पीतांबर कोठें राहियला !”
“ रामअवतारीं गे मीं तो धरिला,
रावण लंकेचा जेव्हां मीं वधिला !
रावण वधितां जीव बहू कष्टियला,
तेव्हां पीतांबर लंके राहियला !”

"अवतारीं त्या अशोकवनांत हो मी !
रावण लंकेचा जैं वधिलां तुह्मीं !
जीव जरी हरि तुमचा बहु कष्टियला,
नाहीं पीतांबर लंके राहियला !"

"कृष्णअवतारीं गे मीं तो धरिला,
निजभवनीं निजलों असतां एकेला !
दूति पाठवुनि आणविलें भामेला,
दिधला पीतांबर जातांना तिजला !
प्रिये एवढा खेद तुला कां झाला ?"

## मुरली.

हरि रे तव मुरली साजिरी ! ॥ धृ० ॥

विसरति मृगपशु चारापाणी,

वत्सें पयपान !

गोपगोपि गृहधनशिशु तीं त्यजिती,

नादाच्या अवसरीं !

एक गवळण न्हाते, केंस ओले गळती,

तिजशीं भान नुरे !

काजळ तें लाविभाला, कुंकुम तें लेई डोळां,

पदिं माखी कस्तुरी !

एक घालितसे वेणि, केंस विंचारितां फणि

टाकी बावरुनी !

जातें मग लगबग, जिव करि डगमग,

विसरोनी शिशु घरीं !

राधा झाली वेडिपिशि, चमकत वीज जशी,

धांवत त्या मार्गीं !

गळा ल्यालि लफ्फा पेट्या, दंडिं चंद्रहार आंगठ्या

सारि आंवळी कंबरी !

जाति मग कुंजवनिं, मधुरमधुर ध्वनि–

नाद घुमे अंबरीं !

तेथुनि सुरवर उतरति झरझर

कुंजवना भीतरीं !

# द्वादशमास.

अश्विन मास हो! रुक्मिणी
विनवी हरि लागूनी
"आह्मां कां जातां टाकूनी ?"
ह्मणुनी लागे चरणीं.
बरवा मुहूर्त जो पाहियला,
हरि प्रवासा गेला!

"कार्तिक मास हो! विष्णूचा
पर्वकाल पुण्याचा!
संगम भरलासे गंगेचा,
नारि जाति स्नानाला!

मार्गशीर्ष हो सुखकर!
आंब्याला ये मोहोर!
बोले कोकिळा मंजूळा,
छाया ये वृक्षाला!

पौष मास हो संक्रांत,
नारी आनंदांत!
नाहीं श्रीहरि हो घरांत,
तिळ देऊं कोणाला ?

माघ मास हो! हा वैरी,
येति थंडिच्या लहरी!

नाहीं श्रीहरि हो मंदिरीं,
साहि न दुःख जिवाला !

फाल्गुन मास हो ! वसंत,
शिमगा खेळति लोक !
नारी उडवीती हा रंग,
रंगवुं मी कोणाला ?

चैत्र मास हो ! उन्हाळा,
येति अग्निच्या ज्वाळा !
नाहीं श्रीहरि तो सांऊळा,
साहि न दुःख जिवाला !

वैशाख मास हो तृतीया,
मिष्ट करीती सखया !
आंब्रमोहोराचा हो भात,
दिन वडिलांचा केला !

ज्येष्ठ मास हो ! दणाणी
मृगाआधिं रोहिणी !
वीजा चमकती गगनीं
जातां वडपूजेला !

आषाढ मास हो ! हा महिना
भरल्या गंगा यमुना !

जाती तीर्थाच्या त्या स्नानीं[1],
नारी वृद्धा बाला !

श्रावण मास हो ! अष्टमिला
कृष्ण असे गोकुळा !
दहिंदुध वाटूं मी कोणाला ?
हरि प्रवासा गेला !

भाद्रपद हो ! साजणी
काक बोले अंगणीं !
शंकर आज मीं देखियला,
श्रीहरि घरासि आला !"

---

१ चातुर्मास स्नानारंभ या महिन्यांत होतो.

# विरहिणी.

हा वसंत सकळांस संत,
करि मन संथ ! सुखावह बाई !
परि हरिसहवासाविण मी करूं काई ?
दिनरजनिं चैन मज नाहीं तिळभरीं !

कांहीं न सुचे मज बाई अंतरीं !
प्रिय अठवण घडिघडि होई श्रीहरी !
हा ताप करी संताप मनामध्यें बाई !
मुखकमळ हरीचें आनंदें करूं पाही !

# द्रौपदिवस्त्रहरण.

ऋतुस्नात मी मंदिरिं होत्यें निवान्त एकान्त
एकाएकीं दुःशासन ये तो धांवत तेथ !
नेऊनी मज उभी ग केली भरल्या सभेंत !
बोले दुर्योधन "ये अंकीं नको खेद वाहूं !"
यादवराया भाई ! येरे नच निष्टुर होऊं !
निढ़ळावरतीं हात ठेउनी वाट किती पाहूं ?

निद्रा तुजला याच वेळिं रे लागे ही कैशी ?
दुष्ट झोंबला माझ्या वसना ! किती अंत बघशी ?
ऐशी दीना तव भगिनी ही दिसते परदेशी !
ये धांउनि हरि ! घाल उडी तूं ! नको उशिर लावूं
यादवराया भाई ! ये रे, नच निष्टुर होऊं !

गजेंद्रानें धांवा केला, त्यासीं सोडविला !
ध्रुवबाळक वनिं हिंडत असतां अढळपदीं नेला !
प्रल्हादाच्या संकटसमयीं स्तंभिं प्रगट होशी !
माझ्या वेळीं मौनच धरिशी ! नको उशिर लावूं !
यादवराया भाई ! ये रे, नच निष्ठुर होऊं !

संचित माझें सरलें देवा ? कर्मशुद्ध नाहीं ?
दैवाचि माझें फिरलें वाटे, तुला शब्द काई !
धर्मार्जुनसहदेवभीमनकुलादिकडे पाहीं !

## अंतर्गृहांतील गीतें.

भीष्मद्रोण विदुर हो! आतां मी कोणा बाहूं?
यादवराया भाई! ये रे नच निष्ठुर होऊं!

जरी किनारी, वसंत, कुसुंबि ऐशा बहुरंगी
वस्त्रीं पर्वत पाडिलेस हरि किती मुखीं गाऊं?

# स्वयंवराख्यान.

जनकनंदिनी उपवर झाली,
वरविवंचना करी पिता !
सुरूप सुंदर द्यावी कोणा
भूपालाला ही सीता !

स्वरूप सुंदर मुखप्रभा ही
चंद्रप्रतिमा विलोकितां,
सूर्यप्रकाशतुल्यचि कांती,
लावण्याची स्वर्गलता !

इजला नवरा ? निमंत्रणानें
भूप आणवुनि स्वयंवरीं,
नियम धनूचा करुनि त्यामधिं;
पत्रें लिहिलीं द्विपांतरीं !

पूर्वि परशुधर चाप ठेवुनी
बद्रिकाश्रमीं तो गेला,
त्या चापाचा घोडा करुनी
सीता फिरवि अंगणाला !

कौतुक ऐसें पाहुनि रायें
मनामध्यें निश्चय केला,
त्र्यंबकचाप परशुधर याचा
उचले कोणा भूपाला.

## १ अंतर्गृहांतील गीतें.

त्र्यंबकचापचि भंगी जो का
याची त्याला ही नवरी !
मल्लाकरवीं आणवुनी तें
सभामंडपामाझारीं.
खंडखंडिंचे भूप पातले
सभे बैसले जनकाच्या,
रावण, त्याला पत्रहि नसतां,
भूप धांवला लंकेचा !
पाहुनि बाळा रावण उठला
हर्ष जाहला चांडाळा !
रावण मेला डोंगर काळा !
त्यावरि कुणि घाला घाला !
सीता सुंदरि बैसुनि उपरीं
राजाविप्रांतें हेरी !
ऋषीमंडळीं मूर्ति सांवळी,
जानकि तेव्हां मनें वरी !
रायें नवरी शृंगारोनी
हस्तिणिपृष्ठीं बैसविली !
शुंडादंडीं माळ देउनी
रंगभूमिवर उभि केली !
पाहुनि रावण, मनीं त्रासली,
सखयांप्रति बाळा बोले,

"पण हा दुस्तर कला तातें,
मजवरि दुर्घट ओढविलें!
राम मम मनीं ठसला नवरा
कैसा उचली चापाला?"
प्रार्थुनि तेव्हां शिवाभवानी
सर्वेहि त्या कुलदेवाला.

भूमिबाला ह्मणे नृपाला
"या दशकंठा मी न वरीं
कमलनयन रघुराय धनुर्धर
नवरा! त्याची मी नवरी!"

रावण करकर दांत खाउनी
धनुष्य ओढी विसां करीं!
थर थर थर थर कंप सूटला,
वेगें पडला धरणिवरी!

भड भड भड भड रक्त ओकला,
धनुष्य पडलें उरावरी!
गर गर गर गर नेत्र फीरवी
रावण दाहि मुखें पसरी!

विश्वामित्र खुणावी "उठ रे
रामा आतां!" रघुराया
अंगुष्टानें चाप उडवुनी
पर्णि आपली मुळमाया!

आनंदित तो जनक होउनी
दूत धाडि अयोध्येसी !
दशरथ कौसल्यादि करूनी
आणविलीं निजनगरासी !

ऋषीश्वरीं मग रामलक्ष्मणा
नेलें अति सन्मानेंसीं,
मुहूर्त पाहुनि लग्नें लाविलीं,
साडे झाले चौ दिवशीं !

आंदण देउनि बहु सन्मानें
पोंचविलें त्या निजनगरीं !
राम जानकी घेउनि गेले !
गुढ्यातोरणें घरोघरीं !

रामकथामृत अद्भुत मेवा,
पक्वान्नांमधीं शिरापुरी !

---

१ विहिणी, करवल्या व वऱ्हाडी स्त्रिया यांना लुगडीं व खण दे[illegible]

# वनगमन.

हा कैकयिनें काय मांडिला दावा !
तिज कोणी तरि समजावा !

ह्मणे रायासी "एक वर मज द्यावा !
अभिषेक भरता व्हावा !
दुज्या वरदानीं हेतू मम पुरवावा !
रघुवीर वना धाडावा !"

हें ऐकुनियां दशरथ पडले धरणीं !
नेत्रांतुनि वाहे पाणी !
"प्राण जातो गे, ऐक विनवणी कानीं !
करिं विचार पुरता ध्यानीं !
रामचंद्र हा केवळ मोक्षदानी !
नित्य आरूढतो विमानीं !
नको करूं अशी तूं करणी !
किति करूं तुझी मनधरणी ?
चालेल बाळ मम चरणीं !
वियोगवल्ली ही दूर करी निजधामा !
वनिं धाडुं नको रघुराया !"

कर्णिं वार्ता ही कौसल्येच्या पडली !
माता दुःखें गडबडली !

कृपणाचा जैसा पैसा गे !
मत्स्य जीवनाविण जैसा !
रामावांचुनि मी काय जाळुं या जीवा ?
वनिं धाडुं नका राजीवा ?
कोण विवशी ही येउनि मधिं चडफडली
ती गोष्ट रायाची नडली !
रायें वाक्य गोविलें नसतां गे !
सारा बेतचि तीचा फसतां !
रघुनंदन राजा असतां !
या कैकयिचें घेतें कुणि ना नाम !
वनिं धाडुं नका गुणधाम !
गति दैवाची विपरीत कशी घडली !"
शोकानें व्याकुळ पडली !
नेसुनि वल्कलें तिघें निघालीं जाया,
वंदुनियां दशरथ पायां !
रघुवीर ह्मणे " शोक नका करुं वांया !
द्या आज्ञा वनासि जाया !"
वशिष्ठ येउनियां नेति रथीं बसवाया,
" आतां येतों ! लोभ असुं द्यावा !"
राम वनवासाला गेला !
शोकानें दशरथ मेला !
गुरू वशिष्ठें आणविलें भरताला,
राज्याभिषेक करण्याला !

## राज्यत्याग.

भरत पुसे कैकयीसि
“ राम कुठें सांग मजसि ?
काय जाहलें पित्यासि ?
शोक काय मांडिला ? ”

कैकयि ह्मणे भरतासि
“ राम धाडिला वनासि !
राज्याभिषेक तुजसि !
तात मृत्यु पावला ! ”

“ दुष्ट बुद्धि काय केलें !
भ्रतारासि मरण दिलें !
रामचरण अंतरिले !
माया नोहे का तुला ? ”

कैकयिचें वचन मोडुनि,
पादुकांसि राज्य अर्पुनि,
रामभेटि आस धरुनि,
नंद्रिग्रामा चालला !

सवें घेऊनी वशिष्ट
चढतांचि चित्रकूट,
प्रेमानंदें दिली भेट !
पूर्णानंद जाहला !

## अंतर्गृहांतील गीतें.

भरत पुत्र कैकयिचा
रामबंधु शोभला !
राज्याचा त्याग करुनि
भजन करित राहिला !

## कौसल्याशोक.

दुडु दुडु दुडु येउनि चुंबुनि दे
केंव्हां गालाला !
बाळावांचुनि उदास दिसतें
मंदिर नयनांला !

घेउनि या हो लवकरि ! श्रमल्यें
माझ्या वेल्हाळा !
फुटला पान्हा ! तान्ह्याविण त्या
पाजूं कोणाला ?

निशिदिनिं वंदुनि त्याला कैकयि
पाजी पान्ह्याला !
निष्ठुर होउनि धाडी कैशी
पाडस व्याधीला ?

तातहि गुंतुनि निष्ठुर झाला
कैकयि वचनाला !
निष्ठुर होउनि पाठवि कैसा
माझ्या रामाला ?

नीळकंठ ही भावें करुनी
ध्यातां घननीळा,
दैवचि माझें मजवरि कोपे
दोष न कोणाला !

## कंचुकीछंद.

कंचुकिचा छंद बाई लागला मला !
पुरविण्यासि इच्छा रघुराय धांवला !

भावोजी एकलीच मजसि सोडुनी,
रेषा ओढुनि शपथुनि जाति तेथुनी !
दुष्ट येत, ह्मणत "घाल भीक सत्वरीं !"
घालाया जातां घे ओढुनी करीं !
गुंफेंतुनि स्कंधावरि घेत धांवला !
लंकेसी आणियलें शीघ्र गे मला !
नित्यनेम येउनियां विनति करितसे,
"हो, हो, हो पट्टराज्ञि ! वचन देतसें !"
सोड सोड सोड अतां मजसि रावणा !
राम येथ येउनियां करिल ताडणा !

## विरही राम.

लपुनि बसुनी प्रीती मम लाविशी कसा !
घनांबुविना धीर निघे चातका कसा ?
शोधुं कुठें शोधुं तुजसि या वनीं प्रिये ?
धीर मुळीं नाहीं मज भेट दे सये !

मुदुल कमल तंतु तुझे पाय चालतां !
पाहण्यांत येतिना वनांत धुंडितां !
शोधुं कुठें ? शोधुं कुठें तुजसि ? हिंडतां
कांत काय शांत हाय! खचित पाहतां ?

मधुर तुझा शब्द श्रवण रंजवील का ?
अभागि हस्त हाय ! कंठिं त्या पडेल का ?

# मुद्रिका.

मुद्रिके सखे! तूं होतिस रामापाशीं !
सोडिलेंस त्वां श्रीराम कुठें वनवासीं ?
भ्रमतात वनामधिं व्याघ्रसिंह आणि लांसी !
रक्षियलें कीं वनिं भक्षियलें राक्षसीं ?
त्या कंचुकिसाठीं राम फिरे लवलाही !
मजपासुनि गेले तसे देखिले नाहीं !
जानकी शोक करि " वनीं मुद्रिके बाई !
सोडिलेंस त्वां श्रीराम कोणत्या ठायीं ?
मुद्रिके सखे ! तूं आलिस कोण्या गुणी ?
ना पंख तुला ! आणियलें तुजला कोणीं ?
कां बोलशि ना तरि ? काय वर्तलें चिन्ह ?
वनफळा जाति श्रीराम आणि लक्ष्मण !
जरि तृष्णा लागे फार मला उष्णानें,
वनिं जाउनि कारती जीव शांत जिवनानें !
चालतां वनामधिं कंटक रुतती पायीं,
तैं राघव नेत्रीं अश्रुप्रवाहीं वाही !
मुद्रिके सखे ! जैं वना चाललों तीघें,
चालवे न मजला बहुत त्यांसवें वेगें;
अंतरेन ह्मणुनी, राम बघतसे मागें,
'या कर्मभवातें सीते ! न भरूं रागें !'

---

१ अस्वली.

मजवीण तयाला न गमे क्षणभर कांहीं !
करि 'सीता! सीता! असे कुठें वैदेही?' "
वृक्षावर होता अंजनिचा तो पुत्र,
हा शोक ऐकतां, स्रवति कपीचे नेत्र !
मग उडी टाकितां पुढें कपीकुलगोत्र,
"तूं दास कुणाचा ? सांग रघुपती कुत्र ?"

## पुनरागमन.

कौसल्या ह्मणे " सुमित्रे ! अवधारीं,
स्वप्न देखिलें मीं, पहाटेच्या प्रहरीं !
राम लक्ष्मण सीता हीं रथांत,
सर्वां समवेत आलीं अयोध्येंत !"

ऐसें बोलतां, आनंदित होत;
तें तो देखियला दारीं हनुमंत !
माता देखूनी, घाली दंडवत !
उचली आलिंगी " होई चिरंजीव !"

सांगे मारुती, ऐसा तो वृत्तांत
"राम सागरीं बांधी शीलासेतु,
लंका घेऊनी, रावण केला घात !
पुष्पक विमानीं तिघें आलीं येथ !

रामाभेटीला मातें या त्वरीत !"
तिघीही माता दांडीं आरूढती,
गुरू वशिष्ठ सुखासनीं बैसती !
सुमंत शत्रुघ्न सेनेसह चालती.

रथीं कुंजरीं पायदळीं किती !
ध्वजा पताका मोर्छिलें झळकती !
माही मूर्तबें छत्र चामरें डुलती !
" आला आला हो ! अयोध्येचा राजा !"

रामनामाच्या उभारिल्या ध्वजा !
" सांडा भ्रांतीला ! राघव पूर्ण भजा !
सर्वा अंतरीं तें रामरूप सजा !"
टाळ, मृदंग, दणाणिती भेरी,
ढोल, शंख ते, वीणा, झांज वरी !
ऐसीं वाजती वाद्यें नानापरी
थोर उत्सवानंदीं नरनारी !
कुंकुम केशर सडे रांगोळ्या परी !
गुढ्या तोरणें, मखरें घरोघरीं !
आरत्या घेउनी ओंवाळीती नारी !
फळें शर्करा वांटी अयोध्यापुरीं !
रामलक्ष्मण भरतशत्रुघ्न भेट !
प्रधान, सुमंत, विश्वामित्र वशिष्ठ !
रामा भेटती नगरवासी जन !
अवघ्या भेटली सीता सुलक्षण !
ऋषी ब्राह्मण आशीर्वाद देती !
पट्टाभिषेक रामावरी करिती !
रामराजया बैसे सिंहासनीं !
सीता वामांगीं असे उभी ध्यानीं !

## पार्वतिस्वप्न.

नेत्रविशाळा, कुरंगनयना,
व्याकुळ मी वल्लभाविना,
शुक्लपक्षिंची जेवि चांदणी
भूधरमंचकिं नभांगणीं !

पहांटे स्वप्नीं शय्यामंदिरिं
हर आले ! तैं, मी नीजूमरी
नाहीं त्या ओळखितां, रुसुनी
गेले निघुनी त्रिशूलपाणी !

नाथ अनाथांच्या मल्हारी !
पाव मशीं ! येई रे झडकरि !
धांवा ऐसा करि हृदयांतरिं !
निद्रा ना मज सुमशेजेवरि !

धांवे उठुनी धांवा करितां,
झांपड डोळ्यावरती असतां !
उदया येतां सूर्य कोटी,
श्रवण कुंडलें रत्नजडितीं

मम मुगुटींची प्रभा फांकिती !
तरिहि डोळ्यांवरि झांपड ती !
चंदनचर्चित असतां, तळमळिं
जळाविणी जेंवीं मासोळी !

## एकादशी.

व्रत हें विष्णूनें सांगितलें इंद्रासी,
षोडशोपचारीं पूजितसे तो त्यासी !
नानापरीचीं वाजंत्रीं वाजती,
सर्व देवांगना त्याही गाणीं गाती !

सर्व स्वर्गींचीं फुलें तीं सरती,
ऋषि ह्मणती, पुढें मुहूर्त किती ?
शृंगारमळ्याचीं फुलें चांगलीं तीं;
ह्मणूनि भरूनी, विमानांत नेती !

तैं त्या मळ्यांत वृद्ध माळी होता;
राजाजवळीं तो वृत्त सांगूं जातां
"सकाळ उठूनी, येईन मळ्यासी"
आज्ञा देई राजा ऐसी सेवकासी !

माळी गेला तो निघूनी मळ्यासी,
काष्टें पेटवुनी बैसे धूमीपाशीं;
राजा रुक्मांगद सकाळ उठीला,
त्वरें रथांत मळीयासी आला !

साष्टांग नमस्कार देवदूतां केला,
रुक्मांगद ह्मणे "तुह्मीं पवित्र असतां,
चौर्यकर्मा कां ऐशा आचरितां ?"
तैं ते ह्मणती "आह्मी इंद्रदूत !

पातक हें ना आह्मांला बाधत !
त्या कर्माची होत व्रतानें हानी !
स्वर्गींचीं विमानें आणियेलीं धरणीं ! ”
रुक्मांगद पुसे “ तें व्रत कैसें आहे ? ”
देवदूत ह्मणे “ व्रत ऐसें आहे हें !
दशमीच्या दिवशीं अळणी ताकभात,
रात्रीं घालावी तूळसी मुखांत !
एकादशीस फलाहार करावा;
उपवास, देवाजवळी वास, घडावा !
द्वादशी दिवशीं, भोजन ब्राह्मणासी,
द्रव्य देऊनी तृप्त करावें त्यासी ! ”
ऐसें सांगोनी विष्णूचें व्रत,
फुलें घेवोनी जाती देवदूत.
व्रत हें रायानें धरियेलें चित्तासी,
हत्तिघोड्यांच्या पागा ठेवि उपासी !
शेळ्यामेंढ्याचीं उपवासी खिल्लारें,
उंच आकाशीं उपवासी पांखरें !
तैशा कळपीं उपवासी गायाह्मैशी,
सर्वांसहित राजा करी एकादशी.
बहूत पुण्य तैं होत मृत्युलोकासी,
मृत्यु पावती ते जाती वैकुंठासी !
रागें यम तो जाई ब्रम्ह्यापाशीं,
ब्रह्मा पाचारी त्वरें मोहिनीसी !

तैं ती मोहिनी केवळ सुरूपरोशी
माळ घेऊनी बसे अनुष्ठानासी !
रुक्मांगदानें देखियली ती नयनीं !
राजा पुसितसे " तूं कोणाची कोण ?"
ह्मणे मोहिनी " देवांगना ! मजसी
योग्य मागतसें वर आपल्यापाशीं !
जो का पाळील माझ्या वचनासी,
माळ घालीन ऐशा भ्रतारासी !"
" माळ घालीं गे, तूं मजलागूनी !
मी राहीन तुझिया अर्ध्यावचनीं !"
माळ घालूनी मंदिरासी नेला !
भूल घालूनी तयासी पाडीला !
"एकादशीचा डांगोरा मीं पिटिला !
शास्त्र सांगितलें मीं प्राणीमात्राला !
कैसें उफराटें झालें माझें मजला !"
ऐसें ह्मणूनी राय निघुनी चालला !
मोहिनी तेव्हां राही पदर धरूनी
"कुठें जातसां मजला टाकुनी ?"
"जात आपल्या गे मी मंदिरासी !
आज आहे गे मजला एकादशी !"
"राया तुह्मीं हो पुत्राचें शिर द्यावें !
नाहीं तर एकादशीव्रत मोडावें !"

## अंतर्गृहांतील गीत.

रुक्मांगद पुसे आपल्या राणीसी,
"शिर पुत्राचें मागे मोहिनि आह्मांशीं !
नाहीं तर ह्मणे, मोडा एकादशी !"
"शिर द्यावें हो बाळाचें मोहिनिसी !
परि मोडूं नये व्रत हें एकादशी !"
रुक्मांगद पुसे आपल्या सुनेसी,
"मोहिनी शिर मागे पुत्राचें आह्मांशीं !"
रुक्मांगद पुसे आपल्या पुत्रासी ,
"शिर तुमचें मागे मोहिनी आह्मांशीं !
नाहीं तर ह्मणे मोडा एकादशी !"
"राय द्यावें हो शिर हें मोहिनिसी !
परि मोडुं नये व्रत हें एकादशीं !"
ऐसें चौघांचें हो एकचित्तमन !
मोहिनी राही उगाच वेडावून !
खड्ग उचलीलें वधण्याला पुत्रासी,
तों प्रगटोनी विष्णु धरिती खड्गासी !
विष्णु विमानीं घेती चौघीजण !
प्राणिमात्राला कळली ही कुणकुण !
"आह्मां सकळांनां घडली एकादशी !
आह्मां टाकूनी, राजा एकला जाशी ?"
हत्तिघोड्यांच्या भरिल्या विमानीं पागा !
गायाह्मैशींच्या कळपां केली जागा !

शेळ्यामेंढ्यांचीं मावती खिल्लारें !
उंच नभींचीं घेतलीं पांखरें !
सर्वांसहीत राजा विमानीं बसला !
ध्वजा लावूनी वैकुंठासी गेला !

## औदुंबर क्षेत्र.

वाडी गावीं पुण्य क्षेत्रीं राही नरहरी!
संनिध वाही कृष्णाबाई संगमावरी!
शाम, शबल हे[1] उभे दोन्हिही वृक्षच्छायेला!
दत्ताच्या दर्शना चला हो! लाभ हो भला!

औदुंबरीं आसन घालुनि बैसे सांऊळा!
कंठीं रुद्राक्षांच्या माळा, जटा पिंगळा!
भगवी छाटी, दंडकमंडलु यांनीं शोभला!
किती भक्त नामस्मरणानें त्यानें उद्धरिला!

आरति, धूपारती करुनी, लोटांगणिं आला,
पंचामृतस्नानें, नैवेद्यें कितीकही तरला!
अनुसूयेच्या पोटीं जन्मुनि, त्रिमूर्ति अवतरला!
पतितोद्धारा, भक्ताकाजा, दत्त उभा ठेला!

---

१ यांच्या पाषाणमूर्ति.

# सासर.

लाडकी लेक मी संतांची,
कृपा रघुनाथाची !
संसार सासऱ्यानें सारा
मांडियला पसारा !
सासू माझी गे सागर,
नित्य लावि करकर !
पांची नणंदा, हमकरणी[1] !
देती टोले उठुनी !
पांची दीर हे भांडती !
स्वस्थ घरासी येती !
वडिल जाव माझी, सुखवासी !
हात न लावि कशासी !
सर्व कामधंदा मी करितें !
एकलि पाण्या जातें !
जिवबा उदेला ! उदेला !
चल जाउं माहेराला !
बाई तव माहेर, सुरपुरी !
दिली ग दुरच्या दुरी !

१ हम करे सो कायदा' करणारणी.

## माहेर.

माहेर तें माझें कैलासनगरीं !
माता माझी ती गिरिजासुंदरी !
माझा पिता हो त्रिपुरान्तकारी !
त्यांची मी कन्या बाई !

शंभो बापारे ! गौरी गे आई !
ऋद्धिसिद्धी हो ! वहिनीबाई !
श्री गणराजा रे ! माझ्या भाई !
माहेरा मजला नेई !

अन्याय माझे ते कोट्यानकोटी !
जगदीश्वरा बापा ! तूं घालिं पोटीं !
माहेरीं न्या मज आपल्या भेटी,
करा कृपा या समयीं !

हरिणी पाडस मी चूकल्यें रानीं,
देवा ! तुह्मांविण ना मज कोणी !
माहेरा न्यावी आपली तान्ही,
करा कृपा या समयीं !

जगदीश्वर तो मजला पावला,
पार्वती समवेत प्रगट जाहला !
आलिंगिती मज धरुनि हृदयाला !
शरण मी त्यांच्या पायीं !

## पुराणव्यक्तिगीतें.

जेंवीं ब्रम्ह्याच्या सावित्रिसि
पावशि, रामाच्या जानकिसी,
पावशि, कृष्णाच्या रुक्मिणिसी !
तेवीं पाव शिवा गिरिजेसी !

## बोलाचा अर्थ.

" कोणाला होतें सोडित ?
कोणाला होतें बांधित ?
कोणाला धरूनि हस्तकिं,
होतें मी फिरवीत मस्तकिं ?
अहो शंकरा ! बोलाचा अर्थ करा !"

" केंसांनां होतिस सोडित !
वेणी तूं होतिस बांधित !
धरुनि फणि ती हस्तकीं,
होतिस तूं फिरवित मस्तकीं !
अगे पार्वती ! बोलाचा अर्थ किती ? "

" कोणाला होतें लावित ?
कोणाला होतें घालित ?
कोणाचें पाहुनि मुख तें,
स्मित मधुर करित मी होतें ?
अहो शंकरा ! बोलाचा अर्थ करा ! "

" कुंकुम तूं होतिस लावित !
काजळ तूं नेत्रीं घालित !
आरशाचें पाहुनि मुख तें,
मधुरस्मित होतिस करिती !
अगे पार्वती ! बोलाचा अर्थ किती ?"

"कोणाला होतें बांधित ?
कोणाला होतें सोडित ?
कोणाला धरुनि हातीं,
मंदिरास होतें जाती ?
अहो शंकरा ! बोलाचा अर्थ करा !"

"गाई तूं होतिस बांधित !
वत्साला होतिस सोडित !
दुग्धपात्र धरुनि हातीं,
मंदिरास होतिस जाती !
अगे पार्वती ! बोलाचा अर्थ किती ?"

"कोणाला होतें सोडित ?
कोणाला होतें आपटित ?
कोणाच्या कांठावरुनी,
चाललें पाय ठेवूनी ?
अहो शंकरा ! बोलाचा अर्थ करा !"

"रहाट तूं होतिस सोडित !
लुगड्याला होतिस आपटित् !
विहिरीच्या कांठावरुनी,
चालशी पाय ठेवूनी !
अगे पार्वती ! बोलाचा अर्थ किती ?"

## गुरुमाउली.

वासना सासू ही गांजीत मजला !
कल्पना नणंद राही संगतिला !
लोभ दीर मज हा नोहे भला !
गुरू माऊली ! न्या माहेराला !

'अहं' सासरा छळितो भारी !
क्रोध हा पीडीतो मज परोपरी !
कांहीं उपाय न सूचत मजला !
गुरूमाऊली ! न्या माहेराला !
जाच न सोसे मला !

साहीजणांनीं छळियेलें मजशीं !
गती जन्माची होणार कैशी ?
ऐशी चिंता हो वाटत मजला !
गुरूमाऊली ! न्या माहेराला !
जाच न सोसे मला !

मी हीन लीन प्रभु दीननाथा !
विनती माझी ही परिसावी आतां !
ह्मणे राधा 'चुकवि संसृती' हारेला !
गुरूमाऊली ! न्या माहेराला !
जाच न सोसे मला !

## विडा.

विडा घ्या हो रघुवीरा !
रामा, रणरंगधीरा !
विनविते जनक बाळी
भावें जोडुनियां करा !
शांति वस्त्रामाजी मृदू
पीत पानें नागवेली,
अहंभाव जाळुनियां
केली सत्व चूनकळी;
मायेची हो ती सुपारी
ऐक्यशस्त्रें फोडियली,
ज्ञान लवंगा उपरी
भावार्थाची कातगोळी;
प्रेम जायपत्री वरी
वैराग्याची जायफळी;
सच्चिदानंद मूर्ती !
माझी परिसावी विनंती !
जयराम सेवक उभा
तबक घेउनियां हातीं !
विडा घ्या हो रघुवीरा !
रामा, रणरंगधीरा !
विनविते जनक बाळी
भावें जोडुनियां करा !

# तुलसीवृंदावन.

सकाळीं उठूनि जाईन वृंदावनीं,
तिथें ती आहे गे तुलसी साजणी !
जाई, मोगरीया, चमेली, शेवंती,
नागचांफा कसा लावीला वरती !
आरसे जडीले किती वृंदावनीं !
मोत्यें माणिकें गे हिरे खणोखणीं !
सारीपाट तेथें खेळे चक्रपाणी,
करीन पूजा ती हळदिकुंकवानीं.
कपिलेचें दुग्ध नैवेद्य देईन,
देव गोविंद तो भाकेसी गोंवीन !

# विष्णुपत्नि.

द्रौपदि, बहीण ती कृष्णाची,
सेवा करि तुलसीची !

“ तुझिया सन्मुख मी उभि राहीं,
आणिक तुजला बाहीं !

तुलसी ! पाव गे सत्वर !
कां होशी निष्ठुर ?
चुड्यावरि घालीं पाखर !
करीं दुष्ट संहार !

तुजला येतील मंजूळा,
कांपितिल वैरीखळां !
रात्रंदिवशीं मी, भजनांत !
किती पाहशी अंत ?

तुलसी ! जोडितें तुज हात !
पुरवीं मनोरथ !
पत्नी विष्णूची, मज तारीं !
मस्तक चरणावरीं ! ”

सेवा करितां पावली,
चतुर्भूज ती झाली !
अभय देऊनी, तिज तारी,
तैशी अवध्या नारी !

# चतुर्देव.

जयदेवि ! जयदेवि ! जय माते तुलसी !
कलियुगतारक एक तूं होसी !
प्रातःकालीं तूझें उत्तम रूप !
दर्शनमात्रें सर्व जातसे पाप !
पूजा केलीयानें हरती संताप,
प्रदक्षिणेनें वैकुंठ प्राप्त !
सायंकालीं तूझें रूप सुंदर !
अंगीं तूझ्या देव आहेत चार !
तूझी पूजा पत्रीं करितो मल्हारी !
दर्शनमात्रें पापें हरती निर्धारीं !
महिमा बहुत तूझा कार्तीकमासीं,
राधादामोदर असती तुजपासीं !
वृंदावनीं तूं एका राहशी,
महिमा तूझा परी सर्वही देशीं !
रामीं कृष्णीं तुलसी नाहीं तो :
वृंदावनीं ते करिती आनंद !
आपण निश्चल तेथें राही गोविं
एका जनार्दनीं तुलसीचा छंद

# नीलकंठ.

नीलकंठ नामसुधा वदनिं हे वसो !
मम नयनीं शिवस्वरूप निशिदिनीं दिसो !

तद्भजनीं चित्त सदा रंगलें असो !
षड्रिपुचा हृदयांतरिं वास मुळिं नसो !

मनमिलिंद चरणकमलिं राहो गुंतुनी !
गुंजारव करित मधुर शिवशिव ध्वनी !

लक्ष्मी ही विनति करी नम्र होउनी !
दीननाथ, तारीं मज भवनदींतुनी !